# स्टीव जॉब्स



लेखिका: पॅम पोलाक
चित्र: जॉन ओब्रायन

मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक

# अनुक्रमणिका

प्रकरण १

# स्टीव जॉब्स

स्टीव जॉब्सला लहानपणापासून यंत्रांचे खूप वेड होते. त्याच्या वडिलांचा यंत्र दुरुस्तीचा कारखाना होता. बाबांचे यंत्र दुरुस्त करण्याचे, त्याची जोडणी करण्याचे काम लहानगा स्टीव भान हरपून पहात असे.



मोठा झाल्यावर स्टीवने कंपनी सुरु केली. तो वेगवगळे पार्ट जोडून मशीन तयार करायचा. ती काही साधीसुधी मशीन नव्हती. गाडी अथवा फ्रीजसारखे आपल्या दैनंदिन जीवनात रोज वापरता येईल असे ते मशीन होते.

ते मशीन होते पर्सनल कॉम्पुटर!

आज स्वत:चा कॉम्पुटर असणे अगदी सहज झाले आहे पण १९७० सालामध्ये मात्र परिस्थिती वेगळी होती.

पहिल्या प्रगत कॉम्पुटरचा शोध १९३८ साली लागला. १९४६ सालचा कॉम्पुटर एका मोठ्या खोलीएवढ्या भव्य आकाराचा होता. स्टीव लहान होता तेव्हाही असाच प्रचंड आकाराचा कॉम्पुटर होता. त्याचा वापर फक्त सरकारी कार्यालयात माहिती गोळा करण्यासाठी होत असे. सामान्य माणसाला असा कॉम्पुटर हाताळणे अशक्य होते.





स्टीवला हे सगळे बदलायचे होते. स्टीव आणि त्याचा मित्र स्टीव वोज्नियाक दोघांनी मिळून गॅरेजच्या छोट्या जागेत ॲपल कॉम्पुटर ह्या नावाची कंपनी सुरु केली. त्यांनी तयार केलेला ॲपल-II हा कॉम्पुटर १९७७ च्या वेस्ट कोस्ट कॉम्पुटर फेअर मधील प्रमुख आकर्षण ठरला. कारण हा कॉम्पुटर हाताळायला लोकांना खूप मजा येत होती.

१९७१ मध्ये स्टीवने पालो अल्टो, कॅलिफोर्निया येथील झेरॉक्स कंपनीच्या संशोधन विभागाला भेट दिली. तिथले इंजिनिअर्स नवीन कॉम्पुटर तयार करत होते.

“हे काय आहे?”, कॉम्पुटरच्या शेजारी असलेल्या एका छोट्या वस्तूकडे (गॅजेट) बोट दाखवत स्टीवने विचारले. इंजिनिअरने ते गॅजेट हाताने फिरवून दाखवले तेव्हा कॉम्पुटर स्क्रीनवरचा ॲरोही फिरला.

“हे पॉईंट आणि क्लिक ग्राफिकल युजर इंटरफेस आहे,” त्या व्यक्तीने समजावून सांगितले. नाव अवघड वाटले पण ते गॅजेट अगदी जादुई काम करत होते. तो माणूस जेव्हा ते गॅजेट हलवून स्क्रीनवरील एखाद्या आयकॉनवर क्लिक करत होता तेव्हा प्रत्येक वेळी नवीन प्रोग्रॅम सुरु होत होता. स्टीवने ते नीट न्याहाळून पाहिले.

१९७९ मध्ये कॉम्पुटर वापरताना प्रत्येक कि (key) ही कीबोर्डमध्ये पंच करावे लागे. त्यामुळे कॉम्पुटरवर काम करण्यासाठी त्या बटणाचे ज्ञान असणे आवश्यक होते.



पण ह्या छोट्याश्या गॅजेटमुळे कॉम्पुटर इतका वापरायला सोपा होऊ शकतो ह्यावर स्टीवला विश्वासच बसेना. आपण बनवलेल्या कॉम्पुटरसाठी देखील असेच काही वापरायचे ह्याची खुणगाठ त्याने मनाशी बांधली.

“हे तुम्ही कधी बाजारात आणणार आहात?” त्याने इंजिनिअरला विचारले.

“हे विकायला बाजारपेठच नाही आहे, त्यामुळे हे वापरायला सोपे आणि मजेशीर असले तरी विकले कुठे जाणार आहे,” त्याने उत्तर दिले.

स्टीव जॉब्सकडे प्रत्येक गोष्टीकडे पाहण्याची वेगळी दृष्टी होती. त्याने त्या गॅजेटकडे पुन्हा एकदा नीट पाहिले. त्याला पुढचे चित्र डोळ्यासमोर स्पष्ट उभे राहिले की करोडो लोक आपल्या घरच्या कॉम्पुटरवर ते गॅजेट वापरताहेत. त्याला ते गॅजेट अजून चांगले करण्यासाठी काही सुधारणा कराव्या लागणार होत्या. तसेच त्याला त्या गॅजेटचे “पॉईंट आणि क्लिक ग्राफिकल युजर इंटरफेस” असे अवघड नाव मुळीच आवडले नाही. त्याऐवजी त्याने त्याचे सोपे सुटसुटीत असे नाव ठरवले – “माउस”.

त्यावेळीच स्टीव जॉबला कळून चुकले की जगात क्रांतिकारी बदल होणार आहे. आणि बदल घडवण्याचे काम तो स्वत: करणार आहे.

# सुरुवातीचे कॉम्पुटर




जसजसे इलेक्ट्रॉनिक तंत्रज्ञान व कॉम्पुटर क्षेत्र प्रगत होऊ लागले तसतसा कॉम्पुटरचा आकार कमी कमी होऊ लागला. आज आपण तळहातावर हाताळू शकणारा कॉम्पुटरही वापरतो जो पूर्वीच्या डेस्कटॉप कॉम्पुटरपेक्षा जास्त कामे करू शकतो.

१९५१ मध्ये अमेरिकेत पहिला व्यावसायिक कॉम्पुटर - युनिवर्सलि ऑटोमॅटिक कॉम्पुटर - युनिवॅक बनवला गेला. त्याचे वजन २९,००० पौंड होते व खोलीतील ४२.५ चौ. यार्ड. एवढी जागा व्यापत होता. आणि तरीही तो एका सेकंदाला फक्त १,९०५ ऑपरेशन करू शकायचा. तेच आजचा आयपॅड एका सेकंदाला १६० कोटी ऑपरेशन करू शकतो.



प्रकरण २

# बालपण

जोआन शिएबल नावाची विद्यार्थिनी विस्कॉन्सिन विश्वविद्यालयात १९५४ मध्ये पदवीचे शिक्षण घेत होती. तिथे ती अब्दुलफत्ताह जंदाली नावाच्या एका सहायक प्राध्यापकाच्या प्रेमात पडली. तो सिरीया देशाचा होता. दोघेही तरुण होते. त्यांच्याकडे पुरेसे पैसे नव्हते. त्यामुळे आपल्याला बाळ होणार असे जेव्हा त्यांच्या लक्षात आले तेव्हा बाळ जन्मल्यावर त्यांनी त्याला दत्तक द्यायचे ठरवले.

पॉल आणि क्लारा जॉब्स मुलासाठी खूप व्याकूळ झाले होते. त्यांनी ह्या दाम्पत्याचे बाळ दत्तक घेतले व त्या बाळाचे नाव ठेवले स्टीवन पॉल जॉब्स. २४ फेब्रुवारी १९५५ मध्ये त्याचा जन्म झाला. स्टीवच्या जन्मानंतर तीन वर्षांनी जॉब्स पतीपत्नींनी पेट्टी नावाच्या मुलीला दत्तक घेतले.





स्टीवचे आपल्या लहान बहिणीवर प्रचंड प्रेम होते परंतु त्या दोघांमध्ये काहीही साम्य नव्हते.

जॉब्स कुटुंबीय कॅलिफोर्नियातील माउंटन व्हू भागात राहत होते. फळांच्या बागाने नटलेली ती अतिशय सुंदर जागा होती. लोक त्या भागाला “व्हॅली ऑफ हार्टस डिलाईट” असे म्हणत. परंतु माउंटन व्हू बदलत चालले होते. तिथे बऱ्याच नवीन कंपन्या प्रामुख्याने नवनवीन इलेक्ट्रॉनिक्स उपकरणे बनवणाऱ्या कंपन्या सुरू झाल्या होत्या. त्यामुळे त्या भागाचे नाव “सिलिकॉन व्हॅली” असे पडले.



# सिलिकॉन व्हली




नॉर्थन अमेरिकेत भरपूर नवीन इलेक्ट्रॉनिक्स कंपन्या सुरु झाल्या होत्या त्यामुळे वर्तमानपत्रांनी त्याचे सिलिकॉन व्हली असे नामकरण केले होते. ह्या नवीन कंपन्या सेमी कंडक्टर चीपचे उत्पादन करीत होत्या. ह्या चीप कॉम्प्टर आणि इलेक्ट्रॉनिक उपकरणामध्ये खूप महत्वाचे कार्य करतात. ह्या चीप बनवण्यासाठी सिलिका म्हणजेच खूप बारीक वाळू कच्चा माल म्हणून वापरली जाते.



स्टीवला वडिलांच्या कार दुरुस्तीच्या कामामध्ये मदत करायला खूप आवडे. स्टीव पाच वर्षाचा असतानाच पॉलनी त्याला कामासाठी छोटेसे बेंच बनवून दिले होते.

त्यांनी स्टीवला करवत व हातोडी कशी वापरायची हेही शिकवले होते. पॉल अतिशय हुशार मेकॅनिक होते. त्यांनी स्वत:ची गॅजेटची आवड मुलामध्येही निर्माण केली होती. शेजाऱ्यांनी स्टीवला पहिला हिथकीट भेट दिला होता. त्यापासून स्टीवने रेडीओ ट्रांझिस्टर बनवला होता.

आपल्या कीटमधला एक पार्ट हरवला आहे असे स्टीवच्या लक्षात आले. ते १९६८ साल होते. तेव्हा स्टीव तेरा वर्षांचा होता. तो कीट एचपी (HP) - हेवलेट पॅकार्ड कंपनीने तयार केला होता. एचपी(HP) ही सिलिकॉन व्हॅलीतील कॉम्प्युटरचे पार्ट बनवणारी महाकाय कंपनी होती. स्टीवने एचपीचे संस्थापक बिल हेवलेट ह्यांचा नंबर शोधून काढला आणि पार्टची तक्रार करण्यासाठी त्यांना थेट फोन लावला. फोनवरचे बोलणे झाल्यावर हेल्वेटनी स्टीवला त्यांच्या कंपनीत उन्हाळी नोकरी करण्याची ऑफर दिली आणि भरपूर मशीनचे पार्ट देण्याचे कबूल केले. त्यावर स्टीवने काय केले असेल असे तुम्हाला वाटते?




अर्थातच त्याने हो म्हटले.

स्टीव हेवलेट पॅकार्ड कंपनीच्या एक्सप्लोरर क्लबमध्येही सहभागी झाला. ह्या क्लबद्वारे इलेक्ट्रॉनिक्समध्ये रुची असणाऱ्या लहान मुलांसाठी लेक्चर आयोजित केली जायची. अशाच एका लेक्चरमध्ये स्टीवने पहिल्यांदा कॉम्पुटर पाहिला.

शाळेत इलेक्ट्रॉनिक्स मध्ये रुची असणाऱ्या मुलांमध्येच तो असायचा. तेव्हा क्रीसेन ब्रेनन नावाची त्याला प्रेमिकाही होती.

कॉम्पुटर क्लबमधील मित्रामुळे त्याची स्टीव वोज्नियाक ह्याच्याशी ओळख झाली. तो स्टीवपेक्षा वयाने बराच मोठा होता. वोज्नियाकचा मेंदू अतिशय तल्लख होता. तो जवळच्याच कॉलेजमध्ये शिकत होता आणि छंद म्हणून कॉम्पुटर बनवायचा.



स्टीव वोज्नियाक

१९७२ मध्ये शालेय शिक्षण संपल्यावर स्टीवने ओरेगॉन येथील रीड कॉलेजमध्ये प्रवेश घेतला. परंतु कॉलेजची फी भरण्यासाठी त्याच्याकडे पैसे नव्हते. म्हणून तो रीड कॉलेजच्या डीनना जाऊन भेटला. वसतिगृहात राहण्याची आणि लेक्चर्सला बसण्याची त्याची मोफत सोय होऊ शकेल का अशी त्याने डीनना विनंती केली. एकवेळ पदवी नाही मिळाली तरी चालेल पण रुची असलेल्या विषयांचे लेक्चर्स तरी ऐकता येतील असे स्टीवला वाटत होते.

पण त्याची विनंती डीन का मान्य करतील?

परंतु हेवलेट पॅकार्डचे संस्थापक बिल हेवलेट ह्यांच्याप्रमाणेच डीनही स्टीवच्या हुशारीने प्रभावित झाले. त्यांनी स्टीवला परवानगी दिल्यामुळे लवकरच त्याला लेक्चर्सना बसता येऊ लागले.

तिथे त्याने पूर्वेकडील वेगवेगळ्या धर्मांचा अभ्यास केला. तसेच सुंदर हस्ताक्षराची कला कॅलिग्राफीही शिकला.



परंतु तेव्हा रोजच्या जगण्यासाठी तत्याला झगडा करावा लागत होता. मित्राच्या खोलीमध्ये तो जमिनीवर झोपायचा. कोकच्या रिकाम्या बाटल्या जमा करून खर्चासाठी थोडे पैसे मिळवायचा. कुणी अन्नदान करत असेल तिथे जाऊन जेवायचा.

स्टीव जवळजवळ अठरा महिने रीड कॉलेजमध्ये राहिला. भरपूर कॉलेज लाईफ अनुभवून झाले होते. आता त्याला भारत पहायचा होता. प्रवासासाठी पैसे जमवण्यासाठी तो अटारी इथे नोकरी करू लागला. तिथे कॉम्पुटर गेम्स बनवले जायचे. त्याचा मित्र वोज्नियाक तिथे आधीपासून नोकरी करत होता. उन्हाळ्यापर्यंत स्टीवने भारतात जाण्याइतके पुरेसे पैसे जमा केले. भारत फिरून तो पुन्हा अटारीला परतला.

१९७६ सालातला पर्सनल कॉम्पुटर भरपूर स्वीच आणि दिवे असलेल्या विमानाच्या कॉकपिटसारखा दिसायचा. पर्सनल कॉम्पुटर सोप्या पद्धतीने हाताळता यावा ह्यासाठी वोज्नियाकने एक सर्कीट बोर्ड बनवला. त्यामुळे समोरचा माणूस टीव्हीवर जो कमांड लिहेल, तो कॉम्पुटर प्रोसेस कसा करेल हे वोज्नियाकने स्टीवला समजावून सांगितले.

वोज्नियाकला तो एक चांगला प्रोजेक्ट होईल अशी खात्री होती. परंतु स्टीवला त्यापेक्षाही त्याचे अधिक महत्व आहे असे वाटले. त्याने ठरवले की अटारी सोडून आता स्वतःची नवीन कंपनी सुरु करायची.

# पाँग

*अटारीने तयार केलेला "पाँग" हा अगदी सुरुवातीच्या व्हिडियो गेम्सपैकी एक होता. तो गेम म्हणजे एक मोठा टेलेफोन बूथ व त्यावर टीव्हीसारखी दिसणारी मोठी स्क्रीन होती.* पाँग हा इलेक्ट्रॉनिक पिंग पाँग सारखा गेम होता. आताच्या आधुनिक काळात हा गेम अगदीच बालिश वाटेल. पण १९७२ साली लोकांना तो खूप आधुनिक गेम वाटला होता. बटण दाबले की स्क्रीनवर दोन थोड्या अंतरावर उभे असलेले खेळाडू एकमेकांच्या दिशेने बॉल फेकतात हे फार मजेशीर वाटले. *पाँग"च्या यशाने कॉम्पुटरवर आणखीन व्हिडिओ गेम बनवण्याची* प्रेरणा दिली. त्यामुळेच आपण आज मॉडर्न गेम खेळू शकतोय.




प्रकरण २

# ॲपलचा शोध

१९७६ साली 'एप्रिल फुल' च्या मुहूर्तावर ॲपल कॉम्पुटर अधिकृतरीत्या बाजारात लाँच झाला. त्यावेळी स्टीव त्याची कलाकार प्रेमिका मैत्रीण – क्रीसेन ब्रेनन सोबत राहत होता. कंपनीचे नवीन ऑफिस म्हणजे त्याच्या बाबांच्या गॅरेज होते. तिथेच सगळे काम चालायचे. त्यांनी ठरवले की ज्या लोकांना कॉम्पुटर बनवायचा असेल त्यांना वोज्जने तयार केलेले सर्कीट विकायचे.





कॉम्पुटर कसा चालतो हे दाखवण्यासाठी वोज्जचे सर्कीट वापरून त्यांनी एक मॉडेल कॉम्पुटर बिल्ड केला. हाच तो पहिला ॲपल कॉम्पुटर.

कॉम्पुटरच्या ह्या मजेशीर नावामागे एक गंमत आहे. स्टीव त्याकाळात भरपूर फळे खायचा. कधी कधी तर जेवण म्हणून तो फक्त फळे खायचा. सगळ्या फळात ॲपल त्याला बेस्ट वाटे. तसाच बेस्ट कॉम्पुटर म्हणून त्याचे नाव त्याने ॲपल कॉम्पुटर ठेवले.

एका इलेक्ट्रॉनिक्स दुकानाच्या मालकाला त्याने वोज्जचे सर्कीट वापरून कॉम्पुटर कसा बिल्ड करायचा हे दाखवले. त्यावर तो दुकानदार म्हणाला, “असे सर्कीट मी कुठे माझ्या दुकानात ठेवणार? आणि अनेक लोकांना तर अजून कॉम्पुटर कसा बिल्ड करायचा हेही माहित नाही. त्यापेक्षा तुम्ही मला तयार कॉम्पुटर द्या, तो मी लोकांना विकेन.”

पन्नास ॲपल कॉम्पुटरसाठी दुकानदाराने स्टीवला पंचवीस हजार डॉलर देण्याचे मान्य केले. तयार कॉम्पुटर त्याला दिले की तो लगेचच स्टीवला पैसे देणार असे ठरले.

स्टीवने लगेच होकार दिला. पण इतके कॉम्पुटर बनवण्यासाठी लागणारा पैसा त्याच्याकडे नव्हता.

स्टीवला त्यावर एक आयडिया सुचली. तो एका इलेक्ट्रॉनिक्स पार्ट विकणाऱ्या दुकानात गेला. त्याने त्या दुकानदाराला कॉम्पुटर बिल्ड करण्यासाठी लागणारे पार्टस उधार देण्यासाठी राजी केले.




उधार घेतलेले पैसे काही दिवसांत परत देण्याची खात्री स्टीवने दिली. समोरची व्यक्ती प्रभावित होईल अशी स्टीवची बोलण्याची हातोटी असल्यमुळे त्या दुकानदाराने स्टीवला पैसे देण्याचे लगेच मान्य केले.

एक ॲपल कॉम्पुटर तयार करण्यासाठी दोनशे वीस डॉलर खर्च आला. तोच कॉम्पुटर स्टीवने त्या दुकानदाराला पाचशे डॉलरला विकला. त्यामुळे इलेक्ट्रॉनिक्स पार्टस विकणाऱ्या दुकानदाराची उधारी चुकती केल्यावरही स्टीव आणि वोज्जला भरपूर नफा झाला.

आज जर तो जुना ॲपल कॉम्पुटर तुम्ही पाहिला तर चक्रावून जाल. त्या कॉम्पुटरबरोबर कि-बोर्ड, मॉनिटर, कॅबिनेट असे काहीही नव्हते. स्टीव आणि वोज्जला पूर्ण कल्पना होती की आपण ह्यापेक्षा नक्की चांगला कॉम्पुटर बनवू शकतो. जर हे सगळे बरोबर असलेला कॉम्पुटर बनवता आला तो लोकांना लगेच तसाच्या तसा वापरता येऊ शकणार होता. आणि अशा कॉम्पुटरचा खपही खूप चांगला होईल ह्याची स्टीवला पूर्ण खात्री होती. स्टीव आणि वोज्ज असा कॉम्पुटर बनवण्याच्या कामाला लागले. त्याला ॲपल॥ असे नाव दिले.



अॅपल-॥ हा स्टीव आणि वोज्जचा ड्रीम प्रोजेक्ट होता. रंग, आवाज, ग्राफिक्स असे सगळे फीचर्स टाकूयात असे वोज्जला वाटत होते तर अधिकची माहिती साठवण्यासाठी फ्लॉपी डिस्क हवी असे स्टीवला वाटत होते.

नवीन कॉम्पुटर छान प्लास्टिक आवरणात फिट्ट केला तर अजून आकर्षक दिसेल हे त्यांना माहीत होते. पण त्यावेळी प्लास्टिक हे मेटल आणि लाकडापेक्षाही बरेच महाग होते. पण त्याने कॉम्पुटर खूप सुंदर आणि आकर्षक दिसेल ह्याची खात्री स्टीवला होती.



फ्लॉपी डिस्क

कॉम्पुटर दिसायला सुंदर असेल तर अजून गिऱ्हाइके हे त्याला पक्के ठाऊक होते. स्टीवने अॅपल-॥ च्या प्रोजेक्टसाठी एक गुंतवणूकदार शोधला. त्याने दिलेल्या पैशामुळे सॅनफ्रान्सिस्कोमधील कॉम्पुटर फेअरमध्ये मांडण्यासाठी ते अॅपल-॥ हा कॉम्पुटर बनवू शकले. अॅपल-॥ मध्ये अनेक नवीन फीचर्स टाकल्यामुळे तो पूर्ण वेगळा कॉम्पुटर झाला होता.

जेव्हा वोज्ज कॉम्पुटर बनवण्यात व्यस्त होता, तेव्हा स्टीवने कंपनीसाठी लोगो तयार करण्यासाठी एका डिझायनरची नेमणूक केली. लोगो म्हणजे त्या विशीष्ट कंपनीसाठी असलेले चित्र.



लोगो जर सुंदर आणि छाप पाडणारा असेल तर लोकांच्या तो कायम लक्षात राहतो. उदा. जनरल इलेक्ट्रीक कंपनीचा लोगो आहे बल्ब. स्टीवला अॅपल कंपनीसाठी अॅपलचे चित्र लोगो म्हणून हवा होता. अॅपलचा लोगो मजेशीर होता. इंद्रधनुष्यी रंगाचा, थोडा तुकडा खाऊन टाकलेला!

वोज्ज आणि स्टीवच्या अफाट मेहनतीला अखेर यश आले. १९७७ साली वेस्ट कोस्टच्या कॉम्पुटर फेअरमध्ये इतर कंपन्यांचे मोठ्या आकाराचे कॉम्पुटर म्हणजे शाळेचे बोजड सायन्स प्रोजेक्टसारखे वाटत होते. त्या पार्श्वभूमीवर अॅपल-॥ जरा जास्तच उठून दिसत होता.

रंग, आवाज, चांगले ग्राफिक्स अशा नवीन फीचर्समुळे ॲपल-II लोकांचे लक्ष आकर्षित करून घेत होता. त्यानंतर इतर सर्व कॉम्पुटर कंपन्या हे फीचर्स कॉपी करू लागल्या.

त्यातील सर्व टेक्नीकल सुधारणाचे संपूर्ण श्रेय स्टीव वोज्नियाकला जाते. अर्थात त्यात स्टीव जॉब्सच्या कल्पक डिझाईनचा तेवढाच मोठा आणि महत्वाचा वाटा आहे. स्टीवलाही वडिलांसारखेच सगळे अचूक लागायचे. कॉम्पुटरच्या आतल्या सर्कीट जोडणाऱ्या वायर ज्या बाहेरून दिसतही नाही त्या देखील स्टीवला अगदी परफेक्ट सरळ लागायच्या. त्याचे वडील मशीन परफेक्ट बनवायचे आणि स्टीवही. सगळे काही सोपे, सुटसुटीत आणि सुंदर दिसले पाहिजे असा त्यांचा कटाक्ष असे.

**प्रकरण ५**

# प्रगती आणि बाहेरचा रस्ता




१९७८ पर्यंत ॲपलचा चांगला जम बसला होता. कंपनीची प्रगती वेगाने चालू होती. स्टीवला ॲपलची सगळी उत्पादने अचूक लागत. स्टीवसोबत काम करणे आव्हानात्मक होते. छोटीशी चूकदेखील त्याला खपत नसे. कधीकधी तो कर्मचाऱ्यांवर इतका मोठा आवाज चढवून ओरडायचा की काही कर्मचारी त्यामुळे अक्षरशः रडायचे.

आणि जर त्याच्या मनासारखे नाही झाले तर तो स्वत:ही ओक्साबोक्शी रडायचा. त्याला खुश ठेवण्यासाठी कर्मचारी खूप मेहनत घेत. पण आपल्याला नेमके काय हवे आहे हे स्टीवला नीट सांगता यायचे नाही. तो फक्त एवढेच म्हणायचा, “प्रत्यक्ष पाहिल्याखेरीज मला नाही समजत.”

१९७९ मध्ये ॲपलने माउस असलेला होम कॉम्पुटर बनवायला सुरुवात केली. त्यासाठी हजारो नवीन कर्मचारी घेतले. स्टीव स्वत: रात्री उशिरापर्यंत काम करायचा आणि आपल्या कर्मचाऱ्यांकडून देखील त्याला जास्तीच्या कामाची अपेक्षा असे. त्याने ॲपलला इतके वाहून घेतले होते की त्याला बाकी कसलीही शुद्ध राहिली नव्हती. क्रीसेनने १७ मे १९७८ मध्ये लिसा नावाच्या गोड मुलीला जन्म दिला. परंतु आपल्या बाळाकडे बघायलाही स्टीवकडे वेळ नव्हता. घराकडे त्याचे पूर्ण दुर्लक्ष झाले होते.

१९८० सालच्या स्टीवने अमेरिकेतील सर्वात तरुण यशस्वी उद्योगपती म्हणून फॉर्च्युन मॅगेझीनच्या यादीत पहिला नंबर पटकावला. वयाच्या पंचविशीत तो मिलेनिअर बनला होता.

आणि १९८१ साली एक भीषण घटना घडली. वोज्जच्या खाजगी विमानाला अपघात झाला.

.



त्या भयंकर अपघातातून बाहेर पडायला वोज्जला कित्येक महिने लागले. त्यानंतर कधीच तो ॲपलमध्ये पूर्ण वेळ काम करू शकला नाही.

# स्टीव वोज्नियाक



स्टीव वोज्नियाक

स्टीव वोज्नियाकही स्टीव जॉब्स प्रमाणेच आताच्या सिलिकॉन व्हलीमध्ये लहानाचा मोठा झाला. वोज्जचा जन्म ११ ऑगस्ट १९५० साली झाला. मिसाईल आणि सॅटेलाईट बनवणाऱ्या लॉकहिड कंपनीत त्याचे वडील इंजिनिअर होते. बालपणापासूनच वोज्जला इलेक्ट्रॉनिक्स सर्कीट बनवण्यात खूप रुची होती.

शाळेत असताना त्याने त्याच्या वडिलांच्या मदतीने सायन्स फेअरसाठी टिक-टॅक-टो नावाचे इलेक्ट्रॉनिक खेळणे बनवले होते. ॲपलमध्ये असताना त्याने अधिकाधिक क्रियाशील असणारी नवनवीन इलेक्ट्रॉनिक्स उपकरणे बनवली. पण त्यातून पैसे कमावण्यात त्याला अजिबात रस नव्हता. पण त्याचा मित्र स्टीव जॉब्सला मात्र मार्केटिंगचे तंत्र अवगत होते. जास्तीत जास्त सामान्य माणसापर्यंत पोचण्यात तो यशस्वी झाला. खूप घट्ट मित्र नसले तरी ते कायम एकमेकांच्या संपर्कात राहिले. वोज्जने चार लग्ने केली. त्याला तीन मुले झाली. आता तो कॅलिफोर्नियातील लॉस गेटोस ह्या शहरात स्थायिक झाला आहे.

स्टीवसाठी हा मोठा धक्का होता. आतापर्यंत त्याने व वोज्जने नेहमी एकत्र काम केले होते. दुसऱ्या इंजिनिअर बरोबर काम करणे त्याला अवघड जात होते. कंपनीत तयार झालेल्या नवीन कॉम्पुटरबद्दल तो अजिबात खुश नव्हता. त्याचा आकार आणि किमंत खूप जास्त होते. त्यासाठी दहा हजार डॉलर द्यायला कुणीही तयार नव्हते.

स्टीवने आधीपासूनच एका नवीन कल्पनेवर लक्ष केंद्रित केले होते ते म्हणजे मॅकॅनतोश कॉम्पुटर. हा ॲपलसारखाच कॉम्पुटर होता. स्टीवला पूर्ण खात्री होती की ह्या कॉम्पुटरमुळे जगभरात मोठा फरक पडेल. ह्या कामासाठी त्याने इंजिनिअर्सच्या गटाची जातीने निवड केली होती. त्यांना काम करण्यासाठी खास झेंडा लावलेल्या वेगळ्या इमारतीत ठेवले होते.



"नौदलात सामील होण्यापेक्षा कधी कधी समुद्री चाचे होणे जास्त फायद्याचे असते," असे स्टीव म्हणायचा. त्यातून त्याला असे म्हणायचे होते की कधीकधी नियमाचे पालन करण्यापेक्षा ते तोडणे जास्त हिताचे असते.

स्टीवने सगळे नियम झुगारून दिले. त्याने बूट घालणे बंद केले. तो फक्त फळे खायचा. नुसती फळं खाल्यामुळे आंघोळीची काही गरज नाही असे त्याला वाटे परंतु काम करणाऱ्या लोकांना त्याच्या अंगाला येणाऱ्या दुर्गंधीमुळे काम करणे अशक्य होई.



तसा विचित्र स्वभाव असला तरी लोकांकडून अशक्य वाटणारी कामे करून घेण्याचे कौशल्य स्टीवकडे होते. स्टीवमधील ह्या ताकदीला ॲपलच्या एका कर्मचाऱ्याने "आरडीएफ(RDF)–रियालिटी डिसटॉरशन फिल्ड" असे नामकरण केले. स्टीवच्या आरडीएफने लोकांना विश्वास दिला की आपण मेहनत घेतली तर स्टीवला हव्या असणाऱ्या गोष्टी साध्य होऊ शकतात.

स्टीवला ॲपलसाठी एका उतम व्यावसायिकाची निकड होती. जॉन स्कली ही ह्या पदासाठी स्टीवच्या मते सुयोग्य व्यक्ती होती.

स्कली हा पेप्सी-कोला कंपनीचा प्रमुख होता. ॲपलमध्ये जावे की नाही ह्याबद्दल त्याच्या मनात संभ्रम होता. म्हणून स्टीवने त्याला स्पष्टच विचारले, "तुला आयुष्यभर हे साखरेचं पाणी विकण्याची नोकरी करायची आहे की माझ्याबरोबर जग बदलायला यायचं आहे?" हेच ते स्टीवचे आरडीएफ कौशल्य! इतर अनेक जणांप्रमाणे स्कलीनेही स्टीवला जे हवे तेच केले. तो ॲपलमध्ये रुजू झाला.



१९८४ मध्ये स्टीवने मॅकॅनतोश कॉम्पुटर बाजारात आणला. “आपल्या सर्वांसाठी” अशी त्या कॉम्पुटरची जाहिरात करण्यात आली. आतापर्यंतचे कॉम्पुटर हे फक्त वैज्ञानिक आणि बुद्धिमान लोकांसाठीच उपलब्ध होते. हा कॉम्पुटर वापरायला सोपा आणि दिसायलाही सुटसुटीत होता. स्टीवने आतापर्यंतचे सर्व ज्ञान ह्या आखीव डिझाईनमध्ये वापरले होते. अगदी रीडला जी कॅलिग्राफी तो शिकला होता त्याचाही वापर त्याने ह्यात केला होता. जेव्हा मॅक कॉम्पुटरवर लोक अक्षरे टाईप करतील ती सुंदर दिसली पाहिजे असा स्टीवचा आग्रह होता. दोन अक्षरांमध्ये किती जागा असावी अश्या छोट्या छोट्या गोष्टीसाठी देखील त्याने भरपूर परिश्रम घेतले होते. मॅक कॉम्पुटरमध्ये विविध फॉन्ट आणि लिहिण्याच्या अनेक स्टाईल निवडीची सोय ठेवली होती. प्रत्येक फॉन्ट इतर फॉन्टपेक्षा थोडा वेगळा होता. त्यामुळे मॅक कॉम्पुटरवर टाईपिंग करणे म्हणजे धमाल होती.

मॅक काही परिपूर्ण कॉम्पुटर नव्हता. ह्यात पुरेशी मेमरी नव्हती आणि अधिक मेमरी घालण्याची सोयही नव्हती. ॲपलमधील एक कर्मचारी त्याला गंमतीने “एक गॅलन पेट्रोलची होंडा” म्हणायचा. स्टीवच्या मते मात्र मॅकॅनतोश कॉम्पुटर “एकदम भारी” होता.

मॅकॅनतोशची पहिली व्यावसायिक जाहिरात १९८४ च्या सुपर बाउल खेळांच्या वेळी झाली. खेळ संपल्यावर सर्वांना मॅक कॉम्पुटरबद्दल अजून जाणून घेण्याची उत्सुकता होती.

थोड्या काळासाठी मॅकॅनतोश कॉम्पुटर मोठ्या प्रमाणात विकले गेले.

परंतु ते खूप यशस्वी नाही झाले.

कारण स्टीवचा अंदाज चुकीचा ठरला. लोकांना होम कॉम्पुटर विकत घेण्यात फारसा रस नव्हता. आणि ज्या लोकांना होम कॉम्पुटर विकत घ्यायचा होता त्यांनी ॲपल ऐवजी आयबीएम किंवा मायक्रोसॉफ्टचा कॉम्पुटर विकत घेतला.

जॉन स्कली ॲपलमध्ये नाखूष होता. स्टीवच्या चुकीच्या धोरणामुळेच मॅकॅनतोशची कमी विक्री झाली होती असे त्याचे ठाम मत होते. सर्वसामान्य लोकांना होम कॉम्पुटरची एकतर गरज नव्हती किंवा त्यांना नको होता असे त्याचे म्हणणे होते. स्कलीच्या मते बाजारात टिकायचे असेल तर ॲपलला उद्योगांसाठी लागणारे कॉम्पुटर बनवणे आवश्यक आहे. तसेच ॲपल कॉम्पुटर इतर कंपनींच्या प्रॉडक्ट बरोबर वापरता आला पाहिजे.

# सुपर बाउल AD

मॅकॅनतोश कॉम्प्युटर १९८४ साली बाजारात आला. जॉर्ज ऑरवेलच्या पुस्तकाचे नावही '१९८४' होते. ह्या पुस्तकात "बिग ब्रदर" म्हणून एक पात्र आहे. जो कुणी सीमा ओलांडतो त्याला बिग ब्रदर शिक्षा करतो. अॅपलच्या पहिल्या मॅकॅनतोशच्या जाहिरीतीत पुस्तकासारखेच जग दाखवले होते. सगळे तसेच करड्या रंगाचे कपडे घालून बिग ब्रदरचा हुकुम ऐकताना टीव्हीवर झळकले. तेवढ्यात एक चमकते कपडे घातलेला धावपटू अॅपल हे पात्र बनून पळत पळत आला व त्याने स्क्रीनवर हातोडी मारून त्याचा चक्काचूर केला. मॅकॅनतोशही अशाच प्रकारे कॉम्प्युटर जगतामध्ये इतर सर्वांचा चक्काचूर करेल असे स्टीवला अभिप्रेत होते. रीडले स्कॉटने ही जाहिरात बनवली होती. रीडले "एलिअन", "ब्लेड रनर" सारख्या सुप्रसिध्द सायफाय सिनेमाचा दिग्दर्शक होता.



साल २००४ मध्ये पुन्हा हीच जाहिरात अॅपलने वापरली. फक्त फरक इतका होता की ह्यावेळी धावपटू आय-पॉडचा हुकुम ऐकत होता.

स्टीवला ती कल्पना मुळीच आवडली नाही. अॅपल कॉम्पुटरसाठी अॅपलचेच प्रॉडक्ट वापरले पाहिजे असे त्याचे मत होते. मॅकॅनतोशच्या आसपास इतर प्रोग्रॅम रन करणे त्याला अजिबात पसंत' होते.

इतर कुणी आपल्याला सूचना देणे हे स्टीवच्या स्वभावात बसणारे नव्हते. स्कलीसारख्या अनुभवी केस पांढऱ्या झालेल्या माणसाकडून खूप शिकायला मिळेल ह्या उद्देशाने स्टीवने त्याला अॅपलमध्ये रुजू करून घेतले होते. त्यांनतर स्टीवला वाटले होते की स्कली सर्व सूत्रे आपल्या हातात देईल. परंतु तसे न करता स्कली नवीन बदल सुचवत होता.

प्रत्येक मोठ्या कंपनीमध्ये सल्ला देण्यासाठी बाहेरील लोक असतात. ह्या लोकांच्या समितीला बोर्ड म्हणतात. कंपनीच्या बोर्डाकडे कंपनीच्या प्रमुखाला पद देण्याचे तसेच बडतर्फ करण्याचे दोन्ही अधिकार असतात. अॅपलच्या बोर्डाने स्कलीला काढून टाकावे ह्यासाठी स्टीवने खूप प्रयत्न केला. पण तसे न होता बोर्डाने स्टीवचीच मॅकॅनतोशचा प्रमुख म्हणून बदली केली.

त्यामुळे स्टीवने मे, १९३५ मध्ये अॅपलचे सर्व अधिकार गमावले. अॅपलच्या इमारतींच्या पलीकडल्या रस्त्यावरच्या नवीन ऑफीसमध्ये त्याची बदली झाली. जुन्या कर्मचाऱ्यांची त्याची गाठभेट थांबली.



स्टीवने आपल्या नवीन ऑफीसला रशियातील एका निर्जन भागाचे "सायबेरिया" असे नाव दिले. नवीन जागी तो फारसा खुश नव्हता. ऑफीसमध्ये तो फार कमी वेळ घालवू लागला. आणि अखेर सप्टेंबरमध्ये त्याने ॲपल सोडले.

पुढे जाऊन काय करण्याचा निर्णय स्टीवने घेतला असावा?

प्रकरण ५

# पुढे काय?

१९८५ सालापर्यंत बरेच जण घरासाठी कॉम्प्युटर घेऊ लागले होते. कॉलेजमध्ये जाणारी मुले अभ्यासासाठी कॉम्प्युटरचा नियमित वापर करू लागली होती. स्टीवने अजूनही कॉम्प्युटरचा व्यवसाय बंद केला नव्हता. आपल्याला चुकीची वागणूक दिली हे त्याला ॲपलला दाखवून द्यायचे होते. त्याने नवीन कंपनी सुरु केली. त्याने कंपनीचे नाव नेक्स्ट (NeXT) ठेवले कारण त्याला खात्री होती की कॉम्प्युटर क्षेत्रातील हे पुढचे पाऊल ठरणार आहे. देशातील सर्व कॉलेजमधील मुले ह्या नवीन कॉम्प्युटरचे ग्राहक म्हणून त्याच्या डोळ्यासमोर होते. विद्यार्थी आणि प्राध्यापक दोघेही ह्या कॉम्प्युटर वापर करू शकतील.

परंतु ह्या नवीन कॉम्प्युटरसाठी स्टीवने केलेली आखणी प्रचंड महागडी होती. त्याने कंपनीचा लोगो बनवण्यासाठी एका सुप्रसिद्ध डिझायनरला काम दिले. त्या लोगोचीच किंमत सुमारे शंभर हजार डॉलर होती.




नेक्स्ट

नेक्स्ट कंपनीला पुढील तीन वर्षात दहा मिलियन डॉलरचे नुकसान झाले. तरीही स्टीव स्वत:चे आणखीन पैसे कंपनीमध्ये टाकत होता. पण त्याचे हे नवीन कॉम्पुटर खूप महाग असल्याने कुणीही विकत घेत नव्हते. पासष्ट हजार डॉलरचा कॉम्पुटर कॉलेजनाही परवणारे नव्हता.

स्टीवला जे अपेक्षित होते त्याप्रमाणे नेक्स्ट कंपनी चालत नव्हती. तरीही त्याचे प्रयत्न चालूच होते. त्याने ॲपलपेक्षा वेगळ्या पद्धतीने ही कंपनी चालवण्याचा प्रयत्न केला. कर्मचाऱ्यांना तो नेक्स्ट समुदायाचा सदस्य म्हणायचा. स्टीव नेक्स्टच्या कर्मचाऱ्यांना त्यांच्या नोकरीच्या कालावधीनुसार पगार देत असे. जितका जुना कर्मचारी तेवढा त्याला पगार जास्त. तो वारंवार पगारवाढही करत असे. स्टीव कितीही उदार असला तरी शेवटी तो एक आक्रमक बॉस होता.

एकीकडे स्टीवच्या कुटुंबात काही घडामोडी चालू होत्या. त्याची आई मृत्यू पावली. जॉब्स पती-पत्नीलाच तो आपले खरे आई-बाप मानत होता पण तरीही जन्मदात्या मात्या-पित्याबद्दल जाणून घेण्याची त्याला उत्सुकता होती.



त्याच्या जन्मदाखल्यावर डॉक्टरांचे नाव होते. त्या डॉक्टरांकडून त्याला कळले की त्याच्या आईचे नाव जोआन शिएबल आहे. तिने त्याच्या बाबांशी म्हणजे अब्दुलफत्ताह जंदालीशी १९५६ मध्ये लग्न केले होते. त्यांना मोना नावाची एक मुलगी आहे. काही वर्षांनी जोआनने सिम्पसन नावाच्या माणसाशी दुसरे लग्न केले आणि बहिण मोना सिम्पसन असे नाव लावत होती. स्टीव आपल्या आई आणि बहिणीला भेटला.



मोना लेखिका होती. स्टीव आणि मोनाचे बालपण एकत्र गेले नाही तरी देखील त्यांचे नाते घट्ट झाले. स्टीवची मुलगी लिसा सात वर्षांशी झाली होती. तिच्याशी स्टीवने जवळीक साधावी ह्यासाठी मोनाने स्टीवला राजी केले.

क्रिसन बेन्नन नंतर स्टीवची अनेक मैत्रिणीबरोबर घसट होती. त्यातील जोआन बाएझ नावाची एक लोकप्रिय लोकसंगीत गायिका होती. जोआन बाएझबरोबर स्टीवला खूप मजा आली. कारण ती त्याच्या आवडत्या गायकाची – बॉब डायलानची जुनी घट्ट मैत्रीण होती.

परंतु स्टीवने तिशी पार केली होती. त्यामुळे लग्न करण्याइतकी जवळीक मात्र कुणाशी झाली नाही.

नंतर १९९० मध्ये स्टँडफोर्ड युनिव्हर्सिटीमध्ये लेक्चर देण्यासाठी जाऊ लागला. त्यात पदवीचे शिक्षण घेणारी लॉरेन्स पॉवेल नावाची विद्यार्थिनी होती.



लिसा ब्रेनन जॉब्स



लॉरेनच्या अप्रतिम सौदर्याने स्टीव तिच्याकडे आकर्षित झाला. काही दिवसातच त्यांची ओळख झाली आणि नियमित एकमेकांशी बोलू लागले.

लॉरेनही स्टीवसारखी प्रचंड हुशार होती आणि शाकाहारी होती. आपापले फोन नंबरही त्यांनी एकमेकांना दिले.

असाच एके दिवशी गप्पा झाल्यावर बिझीनेस मिटिंगला जाण्यासाठी तो गाडीपाशी पोचला. तेव्हा त्याच्या मनात विचार आला की आज माझा जर शेवटचा दिवस असता तर मी ह्या सुंदर स्त्रीचा सहवास सोडून मिटिंगला गेलो असतो का? पार्किंगमध्ये पळत पळत त्याने लॉरेनला गाठले.





दोघांनी एकत्र रात्रीचे जेवण केले. पुढे वर्षभराने दोघांनी योसेमाइट नॅशनल पार्क इथे लग्न केले.

# मोना सिम्पसन




मोना सिम्पसन एक प्रसिध्द लेखिका होती. “एनीव्हेअर बट हिअर” ही पहिली कादंबरी लिहित असताना तिची स्टीवशी भेट झाली. ह्या पुस्तकामुळे तिला नवीन लेखकाला मिळणारा पुरस्कारही मिळाला. पुढे ह्या पुस्तकावर आधारित एक सिनेमा प्रदर्शित झाला. त्यात सुसान सॅरिडॉन आणि नताली पोर्टमनच्या प्रमुख भूमिका होत्या. हे पुस्तक तिने आपल्या आईला आणि भावाला-स्टीवला समर्पित केले. तिचं “रेगुलर गाय” नावाचं अजून एक पुस्तक प्रसिध्द झाले. त्यातील मुख्य पात्र आपल्याशी खूप मिळतेजुळते आहे असे स्टीवला वाटले. स्टीव आणि मोनाचे नाते शेवटपर्यंत खूप घट्ट होते.



स्टीव आणि लॉरेनचे पहिले अपत्य रीड पॉल जॉब्सचा जन्म १९९१ च्या सप्टेंबर महिन्यात झाला. रीड कॉलेजवरून तिचे नाव ठेवण्यात आले.

अजूनही "नेक्स्ट" कंपनीचे काम मार्गी लागले नव्हते. पण स्टीवला आता कळले होते की बिझीनेसपेक्षाही आयुष्यात अनेक गोष्टी महत्वाच्या आहेत. त्याच्या सगळ्यात जवळच्या व्यक्तीचे, वडिलांचे १९९३ मध्ये निधन झाले. वडिलांबरोबर कारच्या व्यवसायात घालवलेला वेळ, त्यावेळच्या आठवणी त्याच्यासाठी आयुष्यभराचा ठेवा होता. बाबा म्हणून आपल्याही अशा आठवणी आपल्या मुलांकडे असाव्या असं त्याला वाटतं होतं. त्याची तरुण मुलगी लिसा पहिल्यांदाच त्याच्याबरोबर राहायला आली होती. फार यश नाही मिळाले तरी चालेल पण किमान सुखी कौटुंबिक आयुष्य मिळावे अशी त्याची मनापासून इच्छा होती.

# स्टीव जॉब्सचे दुसरे वडील

स्टीव जॉब आपल्या जन्मदात्या आईचा शोध घेत होता. परंतु जन्मदात्या पित्याला भेटण्याची त्याला फारशी उत्सुकता नव्हती. पण खरंतर त्यांना तो आधीच भेटला होता. अब्दुलफतेह जंदाली ह्यांचे सिलिकॉन व्हलीमध्ये रेस्टॉरंट होते. जिथे स्टीव अनेकवेळा गेला होता. कैकवेळा दोघांनी एकमेकांशी गप्पा मारल्या होत्या परंतु दोघानाही त्यांच्यातील नात्याची कल्पना नव्हती.

नंतर ब-याच काळाने मोना सिम्पसन वडिलांना भेटली. तेव्हा बोलता बोलता त्यांनी मोनाला सिलिकॉन व्हलीतील रेस्टॉरंटच्या आठवणी सांगितल्या. “माझ्या हॉटेलमध्ये खूप लोक यायचे. अगदी स्टीव जॉब्स देखील. आणि तो भरपूर टीप धायचा.” त्यावेळी मोनाने सांगितले की स्टीव त्यांचा मुलगा आहे.

त्यानंतर त्यांची व स्टीवची प्रत्यक्ष भेट कधीच झाली नाही. परंतु ॲपलचा संस्थापक आपल्याकडे खायला यायचा ह्याचा त्यांना खूप अभिमान होता.



प्रकरण ५

# अनंत आमुची ध्येयासक्ती

काहीतरी नवीन आणि वेगळे करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचे स्टीव जॉब्सला कौतुक वाटायचे. स्टार मूव्हीजचा दिग्दर्शक जॉर्ज लुकसच्या प्रती त्याला अति आदर होता. १९८० मध्ये स्टीवने ॲपलमधील सर्व कर्मचाऱ्यांना "द एम्पायर बॅक टूगेदर" हा सिनेमा पाहता यावा ह्यासाठी पूर्ण रात्रीसाठी चित्रपटगृह भाड्याने घेतले होते.




एकदाचे १९८६ साली स्टीवला लुकस बरोबर एकत्र काम करण्याची संधी मिळाली. स्टीव हा लुकस कॉम्पुटर ग्राफिक्सचा मालक बनला. स्टीवने कंपनीचे नाव बदलून 'पिक्सर' ठेवले. लुकस कंपनीने कॉम्पुटरचा वापर करून नवीन प्रकारचे ॲनिमेशन बनवले होते.



जॉर्ज लुकस

स्टीवला हे नवीन ॲनिमेशन ॲनिमेटर्सना विकायची योजना होती. परंतु ते चांगलेच महाग होते. कलाकारानाही ते फारसे उपयुक्त वाटत नव्हते. पिक्सरला खूप आर्थिक नुकसान होत होते. कंपनी चालू राहण्यासाठी स्टीवने आणखीन स्वतःच्या खिशातून पन्नास मिलियन डॉलर टाकले होते. त्याचा वार्षिक पगार म्हणून तो फक्त पन्नास डॉलर घेत होता.

१९९१ मध्ये स्टीवने पिक्सरच्या इतर सर्व कर्मचाऱ्यांना नोकरीवरून काढून टाकले. फक्त जॉन लॅसेटरला त्याने आपल्या सोबत ठेवले. लॅसेटरने अनेक कॉम्पुटर ॲनिमेटेड शॉर्ट फिल्म्स बनवल्या होत्या.



एखादी गोष्ट ग्राहकांना व्यवस्थितपणे सांगण्यासाठी फिल्म हे उत्तम माध्यम होते. लॅसेटरच्या शॉर्ट फिल्म अतिशय उत्तम होत्या. त्यातील “टीन टॉय” ह्या फिल्मला १९८९ मध्ये बेस्ट ॲनिमेटेड शॉर्ट फिल्मचा ऑस्कर पुरस्कार मिळाला होता.

पिक्सर ही ऑस्कर पुरस्कार फिल्म बनवणारी कंपनी असली तरी ती आर्थिकदृष्ट्या दिवाळखोरीत गेली होती. नेक्स्ट आणि पिक्सर ह्या दोन्ही कंपन्या तोट्यात गेल्याने स्टीवकडे विकण्याचे कसब नाही असे सगळ्यांना वाटू लागले. ॲपलमधील यश हे अनपेक्षित, दैव चांगले असल्याने मिळाले, वोज्जच  जास्त बुद्धिमान आहे, स्टीवकडे हुशारी नाही असे लोक म्हणू लागले.

१९९१ मध्ये वॉल्ट डिस्ने कंपनीने लॅसेटरला नोकरीचा प्रस्ताव दिला. पण स्टीवने त्याला नकार दिला. त्याऐवजी त्याने वेगळा प्रस्ताव मांडला. पूर्ण लांबीच्या तीन ॲनिमेटेड फिल्म्ससाठी पिक्सरला पैसा पुरवण्यासाठी त्याने डिस्नेला राजी केले. हे सगळे ॲनिमेशन कॉम्पुटरवर केले जाणार होते. ह्यापूर्वी असे कुणीच केले नव्हते. स्टीवच्या "आरडीएफ" कौशल्याने डिस्ने प्रभावित झाली होती. आतापर्यंत पिक्सरमधल्या सर्व लोकांना स्टीवचे "आरडीएफ" कौशल्य माहित झाले होते. एखादी व्यक्ती जर मिटिंगमध्ये स्टीवच्या ह्या कौशल्याच्या प्रभावाखाली जाताना दिसली की ते त्या व्यक्तीच्या कानामध्ये हळूच सांगून सावध करायचे.



खरंतर डिस्नेबरोबर झालेल्या ह्या कराराचा पिक्सरला फारसा फायदा होणार नव्हता. सिनेमे यशस्वी झाले तर त्यातील जास्तीत जास्त नफा डिस्नेला मिळणार होता. परंतु ह्यामुळे पिक्सरतर्फे सिनेमे बनवण्याची संधी स्टीवला मिळाली.

ॲनिमेटेड फिल्म बनवणे हे वेळखाऊ काम आहे. पहिली पूर्ण लांबीची फिल्म बनवायला पिक्सरने १९९१ मध्ये सुरुवात केली ती चार वर्षे उलटून गेली तरी पूर्ण झाली नव्हती. दरम्यान पिक्सर आणि नेक्स्ट ह्या दोन्ही कंपन्यामध्ये स्टीव अजूनही पैसा ओतत होता. १९९३ मध्ये त्याला नेक्स्टच्या सर्व कर्मचाऱ्यांना नोकरीवरून काढून टाकावे लागले. त्यामुळे त्याला इतके वाईट वाटले की त्याने ऑफिसला जाणे बंद केले. तो संपूर्ण दिवस रीडसोबत घालवायचा. ह्या लहान बाळाच्या सोबत त्याचा जीव चांगला रमायचा. त्या काळात लॉरेनने केलेल्या सहकार्याबद्दल तो खूप कृतज्ञ होता.



प्रकरण ६

# ॲपलमध्ये पुनरागमन

“”काऊबॉय” आणि “अंतराळवीर” मुळे सगळ्या संकटांतून आपली सुटका होणार आहे हे स्टीवच्या ध्यानीमनीही नव्हते.

"टिन टॉय“ ह्या शॉर्ट फिल्मपासून प्रेरणा घेऊन पिक्सरची पूर्ण लांबीची फिल्म १९९५ मध्ये प्रसारित झाली. त्याचे नाव “टॉय स्टोरी”. “काऊबॉय” आणि “अंतराळवीर” ही त्यातील दोन मुख्य ॲनिमेटेड पात्रे. “टॉय स्टोरी” त्या वर्षीचा सुपरहिट सिनेमा ठरला. त्यानंतर पिक्सरने एका पाठोपाठ एक असे सुमारे डझनभर सुपरहिट सिनेमे दिले.



# कॉम्पुटर ॲनिमेशन

"टॉय स्टोरी" ही पहिली पूर्ण लांबीची ॲनिमेटेड फिल्म जी पूर्णतः कॉम्पुटरवर तयार केलेली होती. टॉय स्टोरीच्या आधी सेल ॲनिमेशनने म्हणजे हाताने पारदर्शी कागदावर चित्रे काढून ॲनिमेशन तयार केले जाई. एखाद्या पात्राचे हात वर खाली दाखवायचे असेल तर त्यासाठी अनेक सेल वापरावे लागत.

"टॉय स्टोरी" मुळे कुठलेही ॲनिमेशन कॉम्पुटरवर करता येते हे दाखवून दिले. आधीचे ॲनिमेशन चित्राप्रमाणे २-डी होते तर कॉम्पुटरवर तयार केलेले ॲनिमेशन (CGI फाईल) ३-डी होते. ह्यातील पात्रे कॅमेराने शुटींग केले आहे असं वाटावी इतकी खरी दिसायची.



कलाकारांना एक स्क्रिप्ट दिली जायची. त्यावर आधारित ते चित्रं काढायचे व ती कॉमिक बुकसारखी स्टोरीबोर्डवर चिकटायचे.

नंतर ह्या स्टोरीबोर्डवरील चित्रांच व्हिडिओटेपवर फिल्मच्या फ्लो, वेळ आणि लांबीनुसार रीळ बनवत.



अभिनेत्यच्या आवाजाचे रेकॉर्डिंग ह्या पात्रांसाठी केले जायचे.



फिल्ममधील पात्रे, सेट, मांडणी अशा सर्व प्रकारचे डिझाईन कलाकार करीत. त्यात ते योग्य ते रंगही भरीत.



कलाकार पात्रे, सेटचे डिझाईनचे ३-डी मॉडेल तयार करीत. त्यानंतर कॉम्पुटरमध्ये हे सर्व स्कॅन करून ठेवले जाई.



मग विशेष कॉम्प्टर सॉफ्टवेअर वापरून आवाज, संगीत आणि इतर स्पेशल इफेक्ट देऊन पात्रांना हालचालीबध्द केले जाई.



दहा वर्षांच्या खडतर संघर्षानंतर १९९६ मध्ये स्टीव जॉब्सला घवघवीत यश मिळाले. आता तो करोडपती नव्हे तर अब्जाधीश झाला होता.

एकीकडे त्याने स्थापन केलेली ॲपल कंपनी अजूनही धड चालत नव्हती. काळानुसार ॲपल कॉम्पुटरमध्ये बदल केले नव्हते. इतर कॉम्पुटर ॲपलपेक्षा जास्त चांगले आणि कमी किमतीत उपलब्ध होते. ॲपल कॉम्पुटरचा स्पीड स्लो होता. दशकात आलेले नवीन प्रोग्रॅम हाताळण्याची त्यात क्षमता नव्हती. स्टीवला ज्या जॉन स्कलीने ॲपलमधून हाकलले होते तोही १९९३ मध्ये ॲपल सोडून गेला होता. बोर्ड ऑफ डिरेक्टर स्टीवने ॲपलमध्ये परत यावे यासाठी प्रयत्नशील होते.



स्टीवला पैशापेक्षा सत्ता जास्त प्रिय होती. आपल्याला हवे ते निर्णय घेण्याची मुभा, बदल करण्याचे स्वातंत्र त्याला मिळणार होते. त्याला असेही महागड्या वस्तू घेण्याचा अजिबात शौक नव्हता. अब्जाधीश असूनही तो एका साध्या घरात राहत होता.



ॲपलमध्ये परत येताना स्टीवच्या मनात संमिश्र भावना होत्या. ॲपलमधील अपमानास्पद वागणूक त्याच्या मनातून जात नव्हती. आताही तो पिक्सरसारख्या मोठ्या यशस्वी कंपनीचा प्रमुख होता. त्याला व लॉरेनला १९९५ मध्ये एरिना सिएना नावाची अजून गोड मुलगी झाली होती. धड न चालणाऱ्या कंपनीमध्ये त्याला परत येण्याची खरच आवश्यकता होती का?



जर ही दुसरी कुठली कंपनी असती तर अर्थातच त्याने नकार दिला असता. परंतु ॲपल हे त्याचं अपत्य होतं. त्यामुळे ही कंपनी बंद होताना पाहणे त्याला शक्य नव्हते.



स्टीवने ॲपलचा प्रमुख म्हणून येण्याचे मान्य केले परंतु थोड्या काळासाठी ह्या अटीवर. त्या दरम्यान त्याच्या जागी दुसऱ्या कोणा योग्य व्यक्तीचा शोध घेण्यास त्याने सांगितले. ॲपलमध्ये परत आल्यावर त्याने एका वर्षाचे मानधन म्हणून फक्त एक डॉलर ठरवले.



ॲपलमध्ये परत आल्यावर लगेचच स्टीवने मोठे बदल करण्याचे निर्णय घेतले. बॉस्टनला १९९७ मध्ये एका सभेत मोठ्या जनसमुदायापुढे ॲपल आणि मायक्रोसॉफ्ट एकत्र काम करेल असे जाहीर केले.

ॲपल आणि मायक्रोसॉफ्ट एकत्र अशी कल्पनाही कुणी केली नव्हती.

परंतु स्टीवने घोषणा केली की आजपासून सर्व ॲपल कॉम्पुटर मायक्रोसॉफ्ट इंटरनेट ब्राऊझरचा वापर करतील.

स्टीवच्या मागे पडद्यावर भलामोठा टीव्ही लावला होता. जेव्हा त्या स्क्रीनवर बिल गेटचा फोटो झळकला तेव्हा सर्व समुदाय चीत्कारला.



स्टीवला पूर्ण खात्री होती की मायक्रोसॉफ्ट बरोबरच हा दीडशे मिलियन डॉलरचा व्यवहार ॲपलला दिवाळखोरीतून वाचवेल. आणि तो बरोबर ठरला.

स्टीवने अजून काही बदल केले. न चालणारे प्रॉडक्ट त्याने बंद केले, खर्चात कपात केली. त्याने इतक्या कर्मचाऱ्यांना काढून टाकले की त्याच्याबरोबर एका लिफ्टमध्ये चढायला ते घाबरायचे.



लिफ्टने आपला मजला येण्याच्या आधीच आपली हकालपट्टी होईल अशी धाकधूक त्यांच्या मनात असायची. मी फक्त तात्पुरता कंपनी प्रमुख म्हणून काम करत आहे हे तो सतत बोलून दाखवायचा.




१९९७ मध्ये टाईम मॅगझिनला दिलेल्या मुलाखतीत त्याने म्हटले होते, "मी इथे सध्या पूर्ण दिवस जरी काम करत असलो तरी हे काही महिन्यांपुर्तीच आहे. त्याबद्दल मला अजिबात संदेह नाही." परंतु तो करत असलेले बदला भविष्यात नक्कीच उपयुक्त ठरणार होते.

# बिल गेट्स

स्टीव जॉब्स आणि बिल गेट्स दोघेही एकाच वेळी कॉम्प्युटरच्या वेडाने झपाटले गेले होते. बिल गेट्सचे बालपण सियाटलमध्ये गेले. हॉवर्ड युनिव्हर्सिटीमध्ये गेला परंतु पदवी पूर्ण केली नाही. १९७५ मध्ये त्याने "मायक्रोसॉफ्ट" ही स्वतःची कॉम्प्युटर कंपनी सुरु केली. १९८० मध्ये मायक्रोसॉफ्ट आयबीएमसाठी सॉफ्टवेअर बनवण्याचे काम करायची. आयबीएम ही ॲपलची मुख्य प्रतिस्पर्धी कंपनी होती. बिल आणि स्टीव आधीपासून एकमेकांना ओळखत होते. एकेकाळी त्यांची मैत्रीही होती पण एकमेकांशी अजिबात पटत नसे.



बिल गेट्स

१९८५ मध्ये मायक्रोसॉफ्टने अनेक कॉम्प्युटर ब्रँडवर चालू शकेल अशी विंडोज ऑपरेटिंग सिस्टम बाजारात आणली. ॲपलप्रमाणेच ह्यातही पिक्चर आणि टेक्स्ट सिलेक्ट करण्यासाठी माउसचा वापर करण्यात आला होता. बिलने ॲपलकडून ही कल्पना चोरली असा स्टीवने आरोप केला. बिलने प्रत्युत्तर दिले की मुळात ही कल्पना झेरॉक्स कंपनीची आहे आणि तिथून त्या दोघांनीही उचलली आहे. स्टीवने ती आधी वापरली एवढेच.

बिलने २००० मध्ये मायक्रोसॉफ्टचे प्रमुखपद सोडले आणि तो त्याच्या बायकोच्या समाजसेवी संस्थेमध्ये पूर्ण वेळ काम करू लागला. ही जगातील सर्वात मोठी सामाजिक संस्था होती. अमेरिकेत शिक्षणासाठी निधी पुरवणे तसेच गरिबी आणि उपासमार संपवणे हा या संस्थेचा हेतू होता. जगभरात अनेक देशांमध्ये आरोग्यासाठीही संस्थेचे काम चालायचे.

प्रकरण ७

# वेगळा विचार

१९७७ मध्ये अमेरिकेतील सर्व शहरातील इमारती, बस, होर्डींगवर एक सारख्या जाहिरीती झळकल्या. काहीतरी नवीन आणि हटके करण्यासाठी प्रसिध्द असलेल्या व्यक्तींचे फोटो त्या जाहिरातीत झळकले होते. त्यात सुप्रसिद्ध दिग्दर्शक अल्फ्रेड हिचकॉकचे पोस्टर लागले होते.




ल्युसी बॉल आणि देसी अर्नाझचे फोटो असलेला पोस्टर होता. असे बरेच पोस्टर लावले होते. जिम हेन्सन आणि केर्मिट द फ्रॉगचे फोटोही होते. प्रत्येक पोस्टरच्या कोपऱ्यात ॲपलचा लोगो होता आणि बाजूला लिहिले होते: “वेगळा विचार करा” (THINK DIFFERENT).

हा सगळ्या जाहिरीती स्टीवच्या सुपीक मेंदूतून उगवल्या होत्या. त्याला त्यातून सुचवायचे होते की ॲपल म्हणजे काहीतरी वेगळी कल्पना घेऊन येणारी कंपनी. ह्या पोस्टरमधून कुठल्याही प्रॉडक्टची जाहिरात केली गेली नव्हती. पण त्यातून ॲपलमध्ये काहीतरी नवीन घडत आहे ह्याची उत्सुकता लोकांच्या मनात वाढत होती.

तर त्याच्यामागील कारण होतं आय-मॅक (iMac) – इंटरनेट मॅकॅनतोश कॉम्पुटर. हा स्वस्त आणि वापरायला सोपा असा पर्सनल कॉम्पुटर लवकरच बाजारात येणार होता.



१९९० च्या दशकात वेळ घालवण्यासाठी वेब सर्फिंग हे एक नवीन आकर्षण लोकांना झाले होते. स्टीवची इच्छा होती की लोकांनी आय-मॅकवर सर्फिंग करावे. त्याला त्याने हटके लूक दिला होता. ब्लूबेरी, ग्रेप, लाईम, स्ट्रॉबेरी, टॅनजेरीन अशा पाच नवीन आकर्षक रंगामध्ये आय-मॅक उपलब्ध होता. जेलीच्या गोळ्या बनवणाऱ्या कारखान्याला भेट दिल्यावर स्टीवला ही कल्पना सुचली होती.





वर्षभरातच आय-मॅक हा सगळ्यात सर्वाधिक खपाचा कॉम्पुटर ठरला. त्याच वर्षी स्टीव आणि लॉरेनने ईव्ह नावाच्या अजून एका गोड मुलीला जन्म दिला. मोठी मुलगी लिसा हॉवर्ड युनिव्हर्सिटीत पत्रकारितेचे शिक्षण घेत होती. स्टीवच्या आयुष्यातील तो सर्वात सुखाचा काळ होता.

खरंतर स्टीव फक्त काही महिन्यांसाठी ॲपलमध्ये रुजू झाला होता. परंतु २००० साली त्याला ॲपलचा कायमस्वरूपी प्रमुख करण्यात आले. ॲपलचा निरोप घेण्याआधी त्याने अनेक मोठ्या योजना आखल्या होत्या.

ॲपलच्या पहिल्या दुकानाचे उद्‌घाटन मे २००१ मध्ये झाले. ॲपल कॉम्पुटर प्रमाणेच ॲपल स्टोरचे डिझाईनही पूर्णत: वेगळे होते. संपूर्ण काचेच्या भिंतीने सजलेली बिल्डिंग एखाद्या उत्तम वास्तूकलेचा नमुना वाटावी इतकी सुंदर होती.

स्टीवने ह्या बिल्डिंगच्या संपूर्ण डिझाईनमध्ये-अगदी जमिनीच्या फरशीपासून ते भिंतीतील कपाटापर्यंत सगळ्यात जातीने लक्ष घातले होते. प्रत्येक छोटीशी गोष्टदेखील त्याला त्याच्या मनाप्रमाणे हवी होती.



ॲपल स्टोअर, फिफ्थ एवेन्यू, न्यूयॉर्क सिटी



ॲपल स्टोर, शांघाय



ॲपल स्टोर
लिंकन रोड, मियामी बीच

दुकानात प्रवेश केल्यावर समोरच "जीनियस बार" म्हणून हेल्प डेस्क होती. तिथे लोक कॉम्पुटरबद्दलच्या शंकाचे निरसन तसेच पर्सनल कॉम्पुटरचे प्रशिक्षण घेऊ शकत होते.



स्टीवने ॲपलला पर्सनल कॉम्पुटरच्या मार्केटमध्ये सर्वात उंचीवर नेऊन ठवले होते. त्याला वाटले होते त्याप्रमाणेच लोक कॉम्पुटरचा वापर कामासाठी तसेच इतर गोष्टींसाठीही करू लागले होते. कॉम्पुटरवर गाणी ऐकायलाही लोकांना खूप आवडू लागले होते. १९९० पर्यंत बहुतांशी लोक सीडीवर गाणे ऐकायचे. आपल्या आवडीच्या गाण्याची सीडी लोक सीडी प्लेयरवर ऐकायचे. त्याचा आकार जरी मोठ्या प्लेटएवढा असला तरी आवाजाची गुणवत्ता विनाईल (ॲनॅलॉग) रेकॉर्ड अल्बमपेक्षा बरीच चांगली होती.

परंतु ह्यापेक्षा अजून काही चांगला पर्याय तयार करू शकतो ह्यावर स्टीव विचार करू लागला. त्याने एक सॉफ्टवेअर विकत घेतले ज्याच्या सहाय्याने सीडीमधील आपली आवडती गाणी कॉम्पुटरमध्ये डिजिटल फाईल म्हणून कॉपी करता येऊ शकणार होती.



ह्यालाच MP3 फाईल म्हटले जाते. एकदा का गाणी कॉम्पुटरवर कॉपी झाली की मग सीडीची काहीच आवश्यकता नव्हती. स्टीवने ह्याला आय-ट्यून्स (iTunes) असे नाव दिले.



आय-ट्यून्सचा(iTunes) वापर करून कॉम्पुटरला आपण पर्सनल ज्यूकबॉक्स बनवू शकतो.

इतर कंपन्याचेही MP3 प्लेअर बाजारात आले होते. हाताळता येतील असे हे छोटे MP3 प्लेअर स्पीकर किंवा हेडफोनला लावून संगीत ऐकता येत असे. त्यासाठी सीडी किंवा टेपची गरज नव्हती. स्टीवनेही ठरवले की ॲपलचा स्वतःचा सीडी प्लेअर असला पाहिजे.

ऑक्टोबर २००१ मध्ये कॅलिफोर्नियाला एक प्रेस कॉन्फरन्स होती. तेव्हा स्टीवने खिशातून हर्शेच्या कॅडबरीपेक्षाही आकाराने लहान असलेले “आय-पॉड (iPod)” नावाचे गॅजेट लाँच केले.

सुरुवातीला आय-पॉड (iPod) फक्त मॅक कॉम्पुटरवरच चालायचा. मग २००२ मध्ये स्टीवने विंडोज ऑपरेटिंग सिस्टमवरही चालेल असा आय-पॉड बनवायला सुरुवात केली. विंडोजवर चालणारा आय-पॉड बाजारात आल्यामुळे त्याचा विक्रमी खप झाला.



ग्राहक आय-पॉडच्या प्रेमातच पडले.

परंतु संगीत क्षेत्रातील लोकांना मात्र हे अजिबात आवडले नाही. सगळे लोक आता सीडीऐवजी आय-पॉडवर गाणी ऐकू लागले. त्यासाठी त्यांना आता सीडी विकत घ्यायची गरज राहिली नाही. एखाद्या मित्राच्या सीडीमधून फुकटात गाणी कॉपी करता यायची किंवा इंटरनेटवरून ही शेअर करता यायची.

लोकांना बेकायदेशीर मोफत मिळणाऱ्या ह्या गाण्यांवर कसा आळा घालायचा हे संगीतक्षेत्रातील लोकांना  कळत नव्हते.

स्टीवला मात्र खात्री होती  की जर लोकांना आवडीचे संगीत सहज आणि अल्प पैशात उपलब्ध केले तर ते नक्की त्याचे पैसे देतील.

स्टीवकडे "वेगळा विचार' करण्याची दृष्टी होती. त्याने २००३ मध्ये आय-ट्युन्स स्टोअर सुरु केले. अर्थात हे नेहमीसारखे इमारतीत असलेले स्टोअर नव्हते. तर ह्यात कॉम्पुटरमध्ये एक प्रोग्रॅम डाऊनलोड करावा लागे. त्याच्याकडे असलेले सगळे कौशल्य वापरून त्याने रेकॉर्ड कंपन्यांना एक गाणे ९९ सेंट्स ह्या दराने सर्व गाणी आय-ट्युन्सला विकायला राजी केले.

आय-ट्युन्स सुरु झाले त्या पहिल्या दिवशीच दोनशे पंचाहत्तर हजार गाणी विकली गेली. आय-ट्युन्सवरून गाणी मागवणे सोपेही होते आणि स्वस्तही. सगळेच आता इंटरनेटवरूनच गाणी मागवू लागले.

# स्टीव जॉब्स आणि संगीत

स्टीव आणि वोज्ज दोघेही कॉम्प्टरवेडे असले तरी त्यांची खरी मैत्री संगीतप्रेमामुळे झाली. दोघेही गायक-गीतकार बॉब डायलनचे चाहते होते. स्टीवने डायलनच्या आवाजातील सर्व बँडमधील रेकॉर्डिंग शोधायला सुरुवात केली. २००४ मध्ये स्टीवला डायलनची प्रत्यक्ष भेट घेता आली. स्टीव "बीटल्स"चा ही मोठा फॅन होता. त्यामुळे त्याने ठरवले की बीटल्सचे संगीतही आय-ट्युन्सवर उपलब्ध करायचे. बीटल्सचे कलाकार आणि त्यांच्या कुटुंबीयांसोबत करार करण्यासाठी त्याला अनेक वर्षे लागली. एकदाचे २०१०मध्ये बीटल्स आय-ट्युन्सवर उपलब्ध झाले.



प्रकरण ८

# महान वेडा माणूस

अ‍ॅपल आणि अर्थात त्यामुळे स्टीवही यशाच्या शिखरावर पोचले होते. रीड, एरीन आणि इव्हची चांगली जडणघडण व्हावी ह्यासाठी तो स्वत: मेहनत घेत होता. लिसाचे हावर्डमधील शिक्षण पूर्ण झाले होते. लॉरेनने गरीब मुलांना कॉलेजला जाता यावे ह्जाण्यासाठी आर्थिक मदतीसाठी “कॉलेज ट्रॅक” नावाची स्वयंसेवी संस्था सुरु केली होती.





स्टीवचेही भविष्यासाठी बऱ्याच योजना आखल्या होत्या. परंतु अचानक अघटीत घडले. २००३ साली वैद्यकीय तपासणीमध्ये स्वादुपिंडाच्या कॅन्सरचे निदान झाले.

डॉक्टर तसेच लॉरेन आणि अनेक मित्रांनी स्टीवला ताबडतोब सर्जरी करण्याचा सल्ला दिला. पण नेहमीप्रमाणे स्टीवच्या डोक्यात “वेगळे विचार” चालू होते. खाण्यापिण्यात बदल करून कॅन्सरला आटोक्यात येऊ शकतो ह्यावर स्टीवचे प्रयोग चालू होते. पण कॅन्सर वाढतच गेला. त्यामुळे जुलै २००४ मध्ये ट्युमर काढण्याचे ऑपरेशन करायला स्टीवने परवानगी दिली. त्याने ॲपलमधील कर्मचाऱ्यांना सांगितले की सप्टेंबरमध्ये तो पुन्हा कामावर रुजू होईल.

स्टीव कामावर परत आलाही. परंतु त्याची तब्ब्येत खालावली होती. वजन कमी होत होते. खूप अशक्त होत चालला होता. त्यामुळे कॅन्सर परत तोंड वर काढतोय की काय अशी भीती इतरांना वाटत होती. परंतु स्टीव आजारपणावर चकार शब्द बोलत नसे. २००५ मध्ये मात्र त्याने स्टॅनफोर्ड युनिव्हर्सिटीत दिलेल्या भाषणात त्याचा उल्लेख केला. त्याने म्हटले, “कॅन्सर झाल्यामुळे मला कळले की आयुष्य खूप मर्यादित आहे, तेव्हा ते दुसऱ्यांच्या आयुष्यात ढवळाढवळ करण्यात वाया घालवू नका. स्वत:च्या हृदयाचा व मनाचा आवाज ऐका आणि हवे ते करायला भिऊ नका.”

स्वत:चे हे शब्द स्टीव शब्दशः जगला. खरंतर त्याच्याकडे फार वेळ नव्हताच. त्यामुळे पुन्हा एकदा तंत्रज्ञानामुळे लोकांचे आयुष्य कसे पालटता येईल ह्याचा विचार तो करू लागला.





२००५ पर्यंत सगळ्यांकडे मोबाईल फोन आले होते. स्टीवकडेही होता पण त्याला तो अजिबात आवडतं नसे. त्याचा फार उपयोग नव्हता आणि दिसायलाही चांगला नव्हता. खरंतर त्यांच्या मित्रांपैकी कुणालाही हा फोन आवडतं नव्हता. त्यावर स्टीवने ठरवले की लोक प्रेमात पडतील असा मोबाईल तयार करायचा.

२००७ मध्ये ॲपलच्या नवीन प्रोडक्टच्या शोमध्ये आयफोन iPhone दाखल झाला. आयफोन (iPhone) फक्त एक मोबाईल फोन नव्हता तर खिशात मावेल असा पर्सनल कॉम्पुटर होता.

आयफोनमुळे बाजारात असलेले इतर सर्व फोन आउटडेटेड झाले. आयफोनला बटणाऐवजी टच स्क्रीन होती.



आयफोनमध्ये इंटरनेट, ईमेल अशा सुविधाही होत्या. त्याने फोटो तसेच व्हिडिओ शुटींग करता येणार होते. सुरुवातीच्या मॅकप्रमाणेच आयफोनमध्ये ही अनेक त्रुटी होत्या. तरीदेखील लोकांचा भरभरून प्रतिसाद मिळाला.

स्टीवला ॲपल कंपनी चालवायला प्रचंड आवडे. परंतु २००९ सालापासून त्याने अधेमध्ये सुट्टी घ्यायला सुरुवात केली. अजूनही कॅन्सरने डोके वर काढले आहे हे मान्य करायला तो तयार नव्हता. पण ॲपलमधील प्रत्येक कर्मचाऱ्याला त्याच्या सुट्टीमागचे कारण माहित होते.

स्टीवने वाल्टर आयझॅकसन ह्या लेखकाशी संपर्क साधला. आयझॅकसन हा आत्मचरित्रे लिहिण्यासाठी प्रसिध्द होता.



आयझॅकसनला स्टीवने त्याचे आत्मचरित्र लिहिण्याची विनंती केली. खरंतर स्टीवचा स्वभाव भिडस्त होता. पण तरीही त्याने आपल्या खाजगी आयुष्याविषयी मोकळेपणे सांगण्याचे ठरवले. आता थोड्या दिवसांचे सोबती आहोत हे स्टीवला कळून चुकले होते. त्यावर्षी एप्रिलमध्ये त्याचे लिव्हर ट्रान्सप्लांटचे ऑपरेशन झाले. ऑपरेशनच्या आधी अर्ध्या गुंगीत असतानाच त्याने तिथली वैद्यकीय व्यवस्था आणि उपकरणे खालच्या दर्जाची आहेत अशी तक्रार केली.

काही महिन्यातच तो पुन्हा कामावर रुजू झाला. तब्येतीच्या इतक्या तक्रारी असतानाही त्याचे नवनवीन काम चालूच होते.

२०१० मध्ये स्टीवने ॲपलचा नवीन टॅबलेट कॉम्पुटर आयपॅड (iPad) लाँच केला. आधीच्या सगळ्यांपेक्षा हा लहान आकाराचा, हलका आणि आकर्षक होता. तसा गेल्या पंचवीस वर्षांपासून बाजारात टॅबलेट कॉम्पुटर उपलब्ध होता. नेहमीप्रमाणे ह्या वेळीही स्टीवचा “वेगळा विचार” दिसून आला. आयपॅड वायरलेस, वापरासाठी हवे तिकडे नेता येईल असा कॉम्पुटर होता. आयफोनपेक्षा आयपॅड आकाराने मोठा असल्यामुळे स्क्रीनवर पुस्तके वाचायला, सिनेमा पहायला, गेम खेळायला सोपे होते.



एका दिवसात ॲपलचे तीन लाख आयपॅड विकले गेले. २०११ मध्ये ॲपल ही जगातील सर्वात यशस्वी कंपनी गणली गेली.

त्याच वर्षी स्टीवने ॲपलमधून निवृत्ती घेतली. काम करण्यासाठी प्रकृती साथ देत नव्हती. तो लॉरैन आणि मुलांबरोबर घरातच वेळ घालवू लागला.





स्टीवचे अनेक मित्र त्याला भेटायला घरी येऊ लागले. बिल गेट्सही गप्पा मारायला येत असे. जुन्या आठवणीना ते उजाळा देत. त्याला ही थोडाफार शहाणा ठेवले आहे त्याचे श्रेय तो लॉरैनेमुला देई. बिललाही हीच भावना आपली पत्नी मेलिंडाबद्दल होती.



स्टीवची बहिण मोना सिम्पसनच्या म्हणण्यानुसार जीव सोडण्याच्या काही तास आधी त्याने बहिण पॅट, लॉरेन आणि मुलांकडे नजर टाकली होती.

त्यावेळी त्याचे शब्द होते, “छान”, “छान”, “छान”. ते त्याचे शेवटचे शब्द ठरले.

त्यादिवशी तारीख होती ५ ऑक्टोबर २०११.



त्याच्या मृत्यूची बातमी ऐकल्यावर जगभरात शोक व्यक्त केला गेला. ॲपल स्टोअरच्या भिंतीवर लोकांनी त्याच्या योगदानाबद्दल धन्यवाद देणारे मेसेज चिकटवले.

श्रद्धांजली म्हणून लोकांनी थोडं तुकडा तोडलेली सफरचंद जमिनीवर ठेवली. कॅलिफोर्नियामध्ये तरुण मुलांनी रस्त्याच्या कडेला मेणबत्त्यांनी ॲपलच्या लोगोचे आकार तयार केले.



स्टीव जॉब्समुळे आपले जीवनमान बदलले अशी लोकांची भावना होती. स्टीवने काही कॉम्पुटर, माउस किंवा एमपी-३ (MP3) चा शोध लावला नव्हता. पण त्याच्यामुळे ह्या गोष्टी सर्वसामान्य माणसाच्या रोजच्या आयुष्याचा भाग बनल्या होत्या. त्याला जे हवे होते ते त्याने मिळवले होते. त्याची सगळी स्वप्ने पूर्ण झाली होती.

त्याच्या मृत्यूची सर्वात आधी घोषणा त्याचा मित्र आणि प्रतिस्पर्धी बिल गेट्सने केली. त्यावेळी बिल म्हणाला, “त्याच्या सोबत काम करायला मिळाले हे माझे भाग्य आहे. तो एक वेडा पण महान माणूस होता.”



## स्टीव जॉब्सच्या जीवनातील ठळक घटनाक्रम

१९६५: २४ फेब्रुवारीला स्टीव जॉब्सचा जन्म

१९६८: बिल हेवलेटनी हेवलेट-पॅकार्डमधील उन्हाळी नोकरीचा प्रस्ताव

१९७२: ओरेगॉनमधील रीड कॉलेजमध्ये शिक्षण

१९७४: अटारीमध्ये नोकरी तसेच भारतयात्रा

१९७६: स्टीव वोज्नियाकसोबत ॲपल कॉम्पुटरची सुरुवात

१९७८: मुलगी लिसाचा जन्म

१९८१: स्टीव वोज्नियाकच्या विमानाला अपघात

१९८४: मॅकॅनतोश बाजारात दाखल

१९८५: ॲपलचा राजीनामा

१९८६: ग्राफ़िक्स ग्रुपची खरेदी, लुकास फिल्म चे "पिक्सर" असे नामकरण

१९९१: लॉरेन पॉवेलशि लग्न, रीड पॉल जॉब्सचा जन्म

१९९३: दत्तक पित्याचे निधन

१९९५: दुसरी कन्या एरिन सिएना जॉब्सचा जन्म

१९९७: ॲपलमध्ये पुन्हा नियुक्ती

१९९८: तिसरी कन्या ईव्ह जॉब्सचा जन्म

२००१: आयपॅड बाजारात लाँच

२००३: स्वादुपिंडाच्या कॅन्सरचे निदान

२००७: बाजारात आयफोन लाँच

२०११: ५ ऑक्टोबर निधन

## जगातील महत्वाच्या बाबींचा घटनाक्रम

१९५६: गायक एल्विस प्रेस्लीचा सुपरहिट "हार्टब्रेक हॉटेल"

१९५७: सोवियत संघाचे स्पुतनिक १ अंतराळात दाखल

१९६३: राष्ट्राध्यक्ष जॉन एफ. केनेडी ह्यांची हत्या

१९६४: बीटलमनियाचे अमेरिकेवर गारुड

१९६५: बॉब डायलनच्या न्यूपोर्ट फोक फेस्टिवलमधील इलेक्ट्रिक गिटार वादनाला प्रेक्षकांची पसंती

१९६९: अपोलो यानाची ११ जुलैला यशस्वी चांद्रस्वारी

१९७२: पहिला स्त्रीवादी अंक – “मिस” प्रसिध्द

१९७४: वाटरगेट प्रकरणावर राष्ट्राध्यक्ष निक्सन ह्यांचा राजीनामा

१९७५: मायक्रोसॉफ्टची स्थापना

१९८०: गायक,संगीतकार जॉन लेननची न्यूयॉर्कमध्ये गोळी मारून हत्या

१९८१: एमटीवीचे रॉक म्युझिक व्हिडिओचे प्रसारण सुरु

१९८६: स्पेस शटल चॅलेजरचा टेक-ऑफ करताना ६३ व्या सेकंदाला विस्फोट

१९९१: सोवियत संघाचे विभाजन

१९९६: डॉली मेंढी पहिली यशस्वी क्लोन मॅमल

२००१: वर्ल्ड ट्रेड सेंटर आणि पेंटागॉनवर ११ सप्टेंबरला अल-कायदाद्वारे हल्ला

२००९: बराक ओबामा अमेरिकेचे पहिले आफ्रिकन अमेरिकन राष्ट्राध्यक्ष

२०११: मे महिन्यात नौसेनेकडून ओसामा बिन लादेनची हत्या